# हुशार केट

ग्रिम ब्रदर्स



चित्रे: अनिता लोबल

पिंपाची तोटी उघडून केट मातीच्या भांड्यात बीयर घेऊ लागली. पण आपण नुकतेच शिजवलेले कबाब घेऊन कुत्रा पळाला, हे लक्षात येताच ती कुत्र्यामागे धावली. या गडबडीत मातीचे भांडे काठोकाठ भरून पिंपातली बरीचशी बीयर सगळ्या फरशीभर पसरली. फरशी साफ करण्यासाठी तिने त्यावर पीठ टाकले. नवीनच लग्न झालेल्या आपल्या पतीला, फ्रेडरिकला तिला समजवावे लागले की आपण चविष्ट जेवण बनवण्याचा प्रयत्न करत होतो, त्यावेळी असा पसारा झाला.

पुढच्या दिवशी काही फेरीवाले त्यांच्या घरी आले. त्यांनी केटला तिच्या पिवळ्या बटणांच्या बदल्यात मातीची भांडी देऊ केली. केटला हा सौदा आवडला. पण ती बटणे सोन्याची आहेत, हे फ्रेडरिकने तिला सांगितले नव्हते.

या गोष्टीत प्रामाणिक आणि प्रेमळ केटला *हुशार* हे विशेषण चिकटवून योग्य तो न्याय दिला आहे. *ग्रिम ब्रदर्स* यांची ही गोष्ट मजेदार आहेच, पण ती पात्रांचे सजीव चित्रण करते. छोट्या वाचकांना हे चित्रण नक्कीच आवडेल, अशी खात्री वाटते.



# हुशार केट

मराठी अनुवादः सुशील मेन्सन



एकदा सकाळी फ्रेडरिक केटला म्हणाला, “मी नांगरणी करायला जातोय. दुपारी जेवायलाच परतेन.”

“मी तुमच्यासाठी चविष्ट जेवण तयार ठेवीन,” केट म्हणाली.

आठवड्याभरापूर्वीच फ्रेडरिक आणि केट यांचे लग्न झाले होते.



केटने घर नीटनेटके केले. दुपारचे जेवण बनवण्यासाठी तिच्याकडे भरपूर वेळ होता.

“फ्रेडरिकसाठी चटकदार कबाब बनवू,” तिने मनाशी ठरवले.

मग तिने कढईत कबाब ठेवले. थोड्या वेळाने कबाब शिजू लागले. त्यांचा खमंग दरवळ सुटला.



“खमंग कबाबसोबत थंड बीयर, किती छान लागेल!” ती स्वत:शीच पुटपुटली.

मग मातीचे एक भांडे घेऊन ती तळघरात गेली.



केटने बीयरच्या पिंपाची तोटी फिरवली. बीयर तिच्या हातातील मातीच्या भांड्यात पडू लागली.

“ही बीयरची धार किती छान दिसतेय!” तिच्या मनात आले.

अचानक तिने मातीचे भांडे खाली जमिनीवर ठेवले.





केटला कुत्र्याची आठवण झाली. ती भरभर पायऱ्या चढून वर आली. कुत्रा दरवाजाच्या बाहेर पळत जाताना तिला दिसला.

कुत्र्याच्या तोंडात कबाब होते. केटने त्याला आवाज दिला, पण कुत्रा शेतावर इथेतिथे पळू लागला. केट त्याच्या मागेमागे धावू लागली.



धावून धावून केटला धाप लागली आणि ती थांबली. “जाऊदे,” म्हणत तिने आपले खांदे उडवले आणि ती घरी परतली.



तळघरात मातीचे भांडे काठोकाठ भरून पिंपातील सगळी बीयर उतू गेली होती. साऱ्या फरशीभर बीयरच बीयर पसरली होती. केट बीयरच्या पिंपाची तोटी बंद करायलाच विसरली होती.



“बापरे! आता फ्रेडरिक काय म्हणेल?” तळघरातील चित्र पाहून केटला चिंता वाटली.

“कबाब गेले आणि आता बीयरचं पिंपसुद्धा रिकामं झालं. तळघरात नुसता चिखल झालाय. काय करावं बरं?” केट विचार करत बसली.







पोटमाळ्यावर पीठाचे एक पोते होते. केट घाईघाईत पोटमाळ्यावर चढली. तिने ते पीठाचे पोते तळघरात आणले. पोते ठेवताना गडबडीत त्याचा धक्का बीयरने काठोकाठ भरलेल्या मातीच्या भांड्याला लागला.

त्यामुळे भांडे कलंडले आणि त्यातील बीयरही फरशीवर सांडली. “अरे देवा! उरलीसुरली बीयरसुद्धा सांडली! आता फ्रेडरिकला प्यायला काय देऊ? काय करू?”



मग ती मनाशी म्हणाली, “जाऊदे.”

केटने पोत्याची गाठ खुली केली आणि सारे पीठ फरशीवर ओतले.

“किती छान आणि स्वच्छ दिसतंय आता!” ती पुटपुटली.



मग ती वर गेली आणि फ्रेडरिकची वाट पाहू लागली. तो येताना दिसताच ती धावत त्याच्यापाशी गेली.

“फ्रेडरिक, सगळी गडबड झाली,” ती सांगू लागली.



“मी तळघरात तुझ्यासाठी पिंपातली बीयर घेत होते, तेव्हाच कुत्र्याने तळलेले कबाब घेऊन पळ काढला. मी त्याच्या मागेमागे धावू लागले. पण तो काही हाती सापडला नाही. मी तळघरात परतले तेव्हा पिंपातली सारी बीयर फरशीवर सांडली होती. पण तू काळजी करू नकोस. मी फरशीवर पीठ टाकलंय. एव्हाना, तळघर पुन्हा पहिल्यासारखंच लख्ख झालंय आणि फरशी चांगली स्वच्छ झालीय.”





“अगं वेडे, कुत्रा कबाब घेऊन पळाला आणि सगळी बीयर फरशीवर सांडली, हे खूप नव्हतं का? पुन्हा पीठ कशाला फुकट घालवलंस? असं करायला नको होतंस तू,” फ्रेडरिक म्हणाला.

“मला काय माहीत, फ्रेडरिक? तू मला आधी सागायला हवं होतंस,” केट म्हणाली.



फ्रेडरिक मनाशी म्हणाला, “अशा पत्नीसोबत संसार करताना मला खूप काळजी घ्यायला हवी. आजपर्यंत साठवलेली सोन्याची नाणी आधी दडवून ठेवायला हवीत.”

त्याने केटला एक पेटी आणायला सांगितली.



मग तो केटला म्हणाला, “हे बघ, मी ही पिवळी बटणं या पेटीत लपवून ठेवतोय. ही पेटी मी गायींच्या गोठ्यामागे असलेल्या जमिनीत पुरणार आहे. याच्याजवळ कधी जाणार नाहीस, असं वचन दे मला.”

“मी वचन देते तुला, फ्रेडरिक,” केट म्हणाली.

पुढच्या दिवशी काही फेरीवाले केटच्या घरी आले. ते मातीची भांडी विकत होते. केटला काही भांडी खरेदी करावीशी वाटली. फ्रेडरिक घरी नव्हता.

“माझ्याकडे पैसे नाहीत. पण माझ्या पतीने पिवळ्या बटणांनी भरलेली एक पेटी गोठ्यामागे पुरून ठेवलीय. भांड्यांच्या बदल्यात ती पेटी तुम्ही घेऊन जाऊ शकता,” केट त्यांना म्हणाली.

“आम्हाला आधी ती बटणं पाहायला हवीत,” फेरीवाले म्हणाले.

“ठीकाय, पण तुमची तुम्हीच माती खोदा आणि पेटी काढा. मी त्याच्याजवळ जाणार नाही, असं वचन दिलंय फ्रेडरिकला,” केट म्हणाली.





फेरीवाले गोठ्यामागे गेले आणि त्यांनी जमीन खोदून पेटी वर काढली. त्यांना पेटीमध्ये बटणांऐवजी सोन्याची नाणी दिसली. नाणी घेऊन फेरीवाले तडक पसार झाले. आपली भांडी घेऊन जाण्याची तसदीदेखील त्यांनी घेतली नाही.



केट खूप खुश झाली.

"किती सुंदर आहेत ही भांडी!" ती म्हणाली.

तिने प्रत्येक भांड्याला एक भोक पाडले आणि भांडी स्वयंपाकघराच्या भिंतींवर टांगून ठेवली.





“हे काय?” घरी परतल्यावर फ्रेडरिकने विचारले.

“गोठ्यामागे पुरून ठेवलेल्या पेटीतल्या पिवळ्या बटणांच्या बदल्यात मी ही मातीची भांडी घेतली,“ केट उत्तरली.

“आणि हो, फ्रेडरिक, तू सांगितलंस तसंच केलं मी. मी अजिबात त्या पेटीजवळ गेले नाही. त्यांची त्यांनीच माती खोदून पेटी काढली,” केट पुढे म्हणाली.



“अगं केट, ती बटणं म्हणजे सोन्याची नाणी होती. तू असं करायला नको होतंस,” फ्रेडरिक कपाळाला हात लावून म्हणाला.

“पण फ्रेडरिक, मला काय माहीत ती सोन्याची नाणी आहेत म्हणून. तू मला अगोदर सांगायला हवं होतंस.”



केटला खूप दुःख झाले.

“आपण त्या चोरांचा शोध घेऊ आणि आपली सोन्याची नाणी परत मिळवू,” ती म्हणाली.

“ही चांगली कल्पना आहे,” फ्रेडरिक म्हणाला. “वाटेत खायला थोडी न्याहरी बांधून घे.”



केटने न्याहरी बनवली आणि ते निघाले. फ्रेडरिक वेगाने चालत होता. सुरुवातीला केटने त्याच्या गतीने चालायचा प्रयत्न केला.



पण तिला जलद चालायचे जमेना. हळूहळू ती फ्रेडरिकच्या मागे पडू लागली.

“असं मागेमागे चालणंच बरंय. घरी परतताना मी फ्रेडरिकच्या पुढे असेन,” ती स्वत:शीच म्हणाली.

थोड्याच वेळात केट एक टेकडी चढून गेली. वर गेल्यावर तिच्या न्याहरीच्या पिशवीतून चीजचा एक गोळा निसटून गडगडत टेकडीच्या पायथ्याशी गेला. “एवढा चढ चढून मी वर आलेय. चीज आणायला खाली गेले तर पुन्हा सगळा चढ चढावा लागेल. त्यापेक्षा दुसरा चीजचा गोळा खाली पाठवते. तो पहिल्या गोळ्याला वर घेऊन येईल,” केटने विचार केला. मग तिने पिशवीतील दुसरा चीजचा गोळा खाली सोडला. पण या दुसऱ्या गोळ्याने पहिल्या गोळ्याला काही वर आणले नाही.

“भरकटला वाटतं!” केट म्हणाली.

“त्याला शोधायला तिसरा चीजचा गोळा खाली पाठवू,” असं म्हणत तिने पिशवीतील आणखी एक चीजचा गोळा टेकडीवरून खाली सोडला.





चीजचे तीनही गोळे परतले नाहीत, हे पाहून केटला राग आला. तिने पिशवीतील चौथा चीजचा गोळा खाली टाकला. आता तिच्याकडे एकही चीजचा गोळा उरला नाही. केटने खूप वेळ वाट पाहिली.



पण चीजच्या गोळ्यांची परतण्याची चिन्हे दिसेनात. शेवटी ती मोठ्याने ओरडली, “मी चाललेय, वाटलं तर माझ्या मागेमागे पळत येऊ शकता.” आणि ती चालू लागली.



शेवटी तिने फ्रेडरिकला गाठलेच. तो तिची वाट बघत थांबला होता. त्याला भूक लागली होती.

“चल, खाऊन घेऊ,” फ्रेडरिक म्हणाला.

केटने त्याला पिशवीतून भाकऱ्या काढून दिल्या.

“चीज कुठाय?” फ्रेडरिकने विचारले.



“येईलच इतक्यात. एक चीजचा गोळा पळाला. त्याला शोधून आणायला मी बाकीच्या चीजच्या गोळ्यांना पिटाळलंय,” केट म्हणाली.

“तू असं करायला नको होतंस, केट,” कपाळाला हात लावत फ्रेडरिक म्हणाला.

“अरे राजा, तू मला आधी तसं सांगायला हवं होतंस,” केट म्हणाली.



भाकरी खाऊन झाल्यावर फ्रेडरिक म्हणाला, “केट, तू घराच्या दाराला कुलूप लावलंयस ना?”

“नाही फ्रेडरिक, तू मला तसं सांगायला हवं होतंस,” केट म्हणाली.



“ठीकाय, आता आधी घरी जा आणि सगळं काही सुरक्षित आहे का, हे बघून ये. येताना काही खायला घेऊन ये. मी इथेच तुझी वाट बघत बसतो,” फ्रेडरिक केटला म्हणाला.

केट पुन्हा घराच्या दिशेने चालू लागली.

केटने पिशवीत काही फळे आणि ज्यूस घेतले. तिने दाराच्या वरच्या भागाला कुलूप लावले आणि दाराचा खालचा भाग बिजागरीपासून वेगळा केला.

"आपल्यासोबत ठेवलं तरच दार सुरक्षित राहील," ती स्वत:शीच म्हणाली.

"दार पाठीवर लादून नेऊ," असं म्हणून तिने दार पाठीवर लादले आणि चालू लागली.

"मी सावकाश चालत गेले तर फ्रेडरिकला तेवढाच जास्त आराम मिळेल," तिने विचार केला.

शेवटी फ्रेडरिक वाट बघत होता तिथे ती पोहोचली.

"बघ, मी दारच घेऊन आले, फ्रेडरिक. आता ते आपल्यापाशी सुरक्षित राहील," केट म्हणाली.





“छान! किती हुशार आहे माझी पत्नी!” फ्रेडरिक म्हणाला, “आता कुणीही आपल्या घरात सहज शिरू शकेल. ठीकाय, परत मागे वळण्यात अर्थ नाही. तू दार सोबत आणलंयस, तर ते घेऊनच तुला चालावं लागेल.”



“हो तर! मी दार पाठीवर घेऊन चालेन. पण ही फळांची पिशवी खूप जड आहे. मी पिशवी दारावर टांगते. म्हणजे, दारच पिशवीला सोबत आणेल.”





फ्रेडरिक आणि केट चालू लागले. शेवटी ते एका जंगलात पोहोचले. काळोख पडू लागला होता. हिंस्त्र जनावरांपासून बचाव करण्यासाठी ते एका झाडावर चढून बसले. तेवढ्यात तिथे तीन माणसे आली. ते त्याच झाडाखाली बसले. त्यांनी शेकोटी पेटवली आणि खिशातून काही सोन्याची नाणी बाहेर काढली.

“बघ, फ्रेडरिक, हेच ते फेरीवाले आणि ती आपली सोन्याची नाणी,” केट म्हणाली.





फ्रेडरिक झाडावरून खाली उतरला. तो फेरीवाल्यांच्या पाठीमागे होता. त्वरित काही दगड गोळा करून तो पुन्हा झाडावर चढून बसला.

मग त्याने ते दगड खाली फेकले. पण दगड फेरीवाल्यांना लागले नाहीत.

“जोरदार वाऱ्यामुळे झाडाची पानं खाली पडतायत वाटतं,” एक फेरीवाला म्हणाला.

एव्हाना, केटला पाठीवरील दार जड वाटू लागले. “फ्रेडरिक, मी पिशवीतली फळं खाली टाकते. म्हणजे, पाठीवरचं वजन कमी होईल,” ती कुजबुजली.

“आत्ता नको केट, चोरांना कळेल, आपण इथे बसलोय ते,” फ्रेडरिक म्हणाला.

त्याचे न ऐकता केटने पिशवीतील फळे खाली टाकली.

“पक्ष्यांची विष्ठा खाली पडतेय वाटतं,” दुसरा एक फेरीवाला म्हणाला.







“अजून वजन वाटतंय दाराचं. मी फळांचा ज्यूससुद्धा खाली टाकते,” केट म्हणाली.

“नको केट, फेरीवाल्यांना कळेल, आपण इथे आहोत ते,” फ्रेडरिक म्हणाला.

त्याचे न ऐकता केटने ज्यूस खाली टाकला.

“दव पडतंय वाटतं, पहाट झाली की काय!” तिसरा फेरीवाला म्हणाला.



“दार अजून भारी वाटतंय. ते खाली टाकून देऊ का?” केटने फ्रेडरिकला विचारले.

“नको, नको, थोडं थांब, नाहीतर त्यांना आपला सुगावा लागेल,” फ्रेडरिक म्हणाला.

केटने त्याचे न ऐकता दार खाली टाकले. जमिनीवर आदळल्यावर दाराचा मोठा आवाज झाला.

“बापरे! सैतान आला की काय!” फेरीवाले घाबरून किंचाळले.





आपला जीव वाचवण्यासाठी फेरीवाले सोन्याची नाणी तिथेच टाकून पळून गेले. थोडे उजाडल्यावर फ्रेडरिक आणि केट झाडावरून खाली उतरले. त्यांनी सोन्याची नाणी गोळा केली. एकही नाणे कमी झाले नव्हते.



मग ते घरी निघाले. त्यांनी दारही सोबत घेतले.

“मला भूक लागलीय,” फ्रेडरिक म्हणाला.



“थोड्या वेळाने खाऊया. वाटेत आपले चीजचे गोळे आपली वाट बघत असतील,” केट म्हणाली.



आणि केटचा अंदाज खरा ठरला.

समाप्त